दुय्यम निबंधक, मारेगांव, जिल्हा- यवतमाळ या कार्यालयाकरिता नवीन इमारतबांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

## शासन निर्णय क्रमांक:आस्थाप-२०१९/५०८/प्र.क्र.७८/म-१

दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ जुलै, २०२३.

संदर्भ:१) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. का-९/आस्था-७/न.इ.बां./मारेगांव/प्र.मा./२०२१/१०९/२०२१,दिनांक २६.०३.२०२१.

२) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. का-७/ लेखा/PLA Policy/१२९/२०२३, दिनांक ०३.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

नोंदणी उपमहानिरीक्षक, अमरावतीयांचे अधिनस्त दुय्यम निबंधक, मारेगांव, जिल्हा- यवतमाळया कार्यालयाच्या नवीन इमारत बांधकामासाठीरु.३,६०,४०,०००/- (रुपये तीन कोटी साठ लाख चाळीस हजारफक्त)इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांनी संदर्भ क्र.१ व २ येथील पत्रान्वये केली आहे.

०२. सदर अंदाजपत्रककार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,अमरावती यांनी तयार केले असून,क्षेत्रीय स्तरावरील तांत्रिक मान्यता (Technical sanction) प्रदान करण्यास सक्षम अधिकारी (Superintending Engineer, यवतमाळ ) यांनी तांत्रीक मान्यता प्रदान केली आहे. तसेच क्षेत्रीय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी सहमती दर्शवली आहे.

**शासन निर्णय :-**

नोंदणी उपमहानिरीक्षक, अमरावतीयांचे अधिनस्त दुय्यम निबंधक, मारेगांव, जिल्हा-यवतमाळया कार्यालयाच्या नवीन इमारतीच्या बांधकामास सोबतच्या सहपत्र "अ" मध्ये दर्शविल्यानुसार रु.३,६०,४०,०००/- (रुपये तीन कोटी साठ लाख चाळीस हजारफक्त)इतक्या किंमतीच्याअंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून शासन प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे.

(i) प्रस्तुत काम हाती घेण्यापूर्वी या कामाचे नकाशे व आराखडे शासकीय वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन घेणे बंधनकारक आहे. त्याचबरोबर त्यावर उपभोक्ता विभागाची स्वाक्षरी घेणे आवश्यक आहे.

(ii) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(iii) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

(vi) प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा वापर करावा अथवा उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वस्तू व सेवा खरेदीकरिता केंद्र शासनाने

विकसीत केलेल्या GeM पोर्टल कार्यपध्दतीचा अवलंब करणे शक्य आहे किंवा कसे, या बाबीचा उपभोक्ता विभागाने त्यांच्या स्तरावर स्वतंत्ररित्या विचार करावा.

(v) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(vi) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

(vii) इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

(viii) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

०२. सदर कामासाठी येणारा खर्च सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षातील मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, नोंदणी व मुद्रांक विभाग इमारतीचे बांधकाम (४०५९ २४९७) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पिय अनुदानामधून भागविण्यात यावा.

०३. सदर कामाची सुरुवात सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षापासून सुरु करण्यात यावी.

०४. सदर मान्यता, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचेकडील शासन निर्णय क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय,दि.१५.०५.२००९ व सुधारित क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१, नियम-१३४ नुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२३०७०३१६००५८२११९असा आहे.

सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRACHI
SUBHASH PALAV

Digitally signed by PRACHI SUBHASH PALAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=b12a57f3f1547a8767ce0e7181ecb77647d3da9cac2c120c823eb1b68c07dd43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5479AEF7E1148D256D58123C94081F8B8C9AF5CFCE5AAF933DFA4DC33E2DE372, cn=PRACHI SUBHASH PALAV
Date: 2023.07.03 16:03:37 +05'30'

**( प्राची सुभाष पालव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे (मुळ अंदाजपत्रकांसह)

**प्रत,**

१) महालेखापाल, १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर

२) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर

३) नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, अमरावती विभाग, अमरावती.

४) सह जिल्हा निबंधक वर्ग-१, यवतमाळ (नों.म.नि. यांचेमार्फत)

५) संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पांढरकवडा (नों.म.नि. यांचेमार्फत)

६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती(नों.म.नि. यांचेमार्फत)

७) सार्वजनिक बांधकाम विभाग (कार्या.इमा ३), मंत्रालय, मुंबई.

८) निवडनस्ती (म-१), महसूलववनविभाग, मंत्रालय, मुंबई.